राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांची सन २०२२ ची उन्हाळी सुट्टी व शैक्षणिक वर्ष सन २०२२-२३ सुरू करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५८/एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ११ एप्रिल, २०२२.

वाचा :- १) शासन परीपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१७८/एसडी-६,दिनांक २४ मार्च,२०२२.
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),पुणे यांचे दिनांक ३१ मार्च,२०२२ चे पत्र.

**शासन परिपत्रकः-**

उपरोक्त विषयाचे संदर्भाधिन परिपत्रकाचे कृपया अवलोकन व्हावे.

शैक्षणिक वर्ष २०२१-२२ मध्ये राज्यातील इयत्ता १ ली ते ९ वी व इयत्ता ११ वी च्या शाळा पूर्ण क्षमतेने सुरू करण्यास तसेच शाळांची वेळ व कार्यकाळाबाबत संदर्भीय शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत.

संपूर्ण राज्यातील शाळांच्या कालावधीमध्ये एकवाक्यता व सुसंगती आणण्यासाठी सन २०२२ ची उन्हाळी सुट्टी व आगामी शैक्षणिक वर्ष २०२२-२३ मध्ये शाळा सुरू करण्याबाबत शासन स्तरावरून निर्णय घेण्याची बाब विचाराधीन होती.

१) सोमवार दि.०२ मे, २०२२ पासून उन्हाळी सुट्टी लागू करून सदर सुट्टीचा कालावधी रविवार दि. १२ जून, २०२२ पर्यंत ग्राहय धरण्यात येवून पुढील शैक्षणिक वर्ष सन २०२२-२३ मध्ये दुसरा सोमवार दि. १३ जून, २०२२ रोजी शाळा सुरू करण्यात येतील. तसेच जून महिन्यातील विदर्भाचे तापमान विचारात घेता उन्हाळयाच्या सुट्टी नंतर तेथील शाळा चौथा सोमवार दि. २७ जून, २०२२ रोजी सुरू होतील.

२) इयत्ता १ ली ते ९ वी व ११ वी चा निकाल दिनांक ३० एप्रिल, २०२२ रोजी अथवा त्यानंतर सुट्टीच्या कालावधीत लावता येईल, तथापि तो निकाल विद्यार्थी/पालकांपर्यंत पोहचविण्याची जबाबदारी संबंधीत शाळेची राहील.

३) शाळांतून उन्हाळयाची व दिवाळीची दीर्घ सुट्टी कमी करून त्याऐवजी गणेशोत्सव अगर नाताळ यासारख्या सणांचे प्रसंगी ती समायोजनाने संबंधित जिल्हयाच्या शिक्षण अधिकारी ( प्राथमिक / माध्यमिक ) यांच्या परवानगीने घ्यावी.

४) माध्यमिक शाळा संहिता नियम ५२.२ नुसार शैक्षणिक वर्षातील सर्व प्रकारच्या एकूण सुट्या ७६ दिवसापेक्षा जास्त होणार नाहीत, याची दक्षता घेण्यात यावी.

५) आगामी शैक्षणिक वर्षापासून यापुढे दरवर्षी राज्यातील सर्व प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा जून महिन्यातील दुसऱ्या सोमवारी (त्या दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास त्यानंतरचा दिवस) तसेच विदर्भातील तापमान विचारात घेता जून महिन्यातील चौथ्या सोमवारी (त्या दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास त्यानंतरचा दिवस) जी तारीख असेल त्या तारखेपासून शाळा सुरू होतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०४१११८३८५४९९२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2022.04.11 18:43:22 +05'30'

**( इ. मु. काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
२) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
३) मा.अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
४) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,
५) राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई
६) संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र,पुणे
७) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे,
८) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे
९) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१०) प्राचार्य,जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण विकास संस्था (सर्व),
११) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर),जिल्हा परिषद (सर्व) /सर्व शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई महानगरपालिका,
१२) प्रशासन अधिकारी (महानगरपालिका/नगरपालिका) (सर्व),
१३) निवड नस्ती (कार्या.एस.डी.४).